विनंती बदली २०२५
उप अभियंता (स्थापत्य) संवर्गातील
अभियंत्यांची बदली.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग, मंत्रालय,**
**शासन आदेश क्र : टिएफएस २०२५/(प्र.क्र.११३/२०२५)/आ (वर्ग-२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : -३० /०५/२०२५

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदींनुसार जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत असलेले सोबतच्या विवरणपत्रातील (स्तंभ-२ मध्ये) नमूद केलेल्या उप अभियंता संवर्गातील अभियंत्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी (स्तंभ-४ नुसार) विनंतीनुसार बदली करण्यात येत आहे.

२. आदेशात नमूद अभियंता ज्या कार्यालयात कार्यरत आहेत, त्या कार्यालयाच्या संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की संबंधित अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी त्यांना त्वरित कार्यमुक्त करावे. यानुषंगाने अडचणी उद्भवल्यास संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल याची नोंद घ्यावी.

३. संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की, शासन स्तरावरील प्रस्तुत आदेश प्रथम कार्यान्वित करुन तद्नंतरच क्षेत्रीय स्तरावरील प्रदेशांतर्गत बदल्यांचे आदेश कार्यान्वित करावेत. शासनाने केलेल्या आदेशात क्षेत्रीय स्तरावर कोणतेही बदल करण्यात येऊ नयेत. पदस्थापनेच्या ठिकाणी पद रिक्त नसेल अथवा अन्य कारणांमुळे बदली कार्यान्वित करण्यास प्रशासकीय अडचण उद्भवत असेल तर, अशा बाबतीत शासनास तात्काळ अवगत करुन अहवाल सादर करावा.

तसेच, संबंधित अभियंत्यास कोणत्या दिनांकास कार्यमुक्त करण्यात आले व नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass२.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत कळवावे.

४. संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की, त्यांनी वरीलप्रमाणे संबंधित उप अभियंता यांच्या बदलीची अंमलबजावणी करताना सदर बदलीच्या ठिकाणी कोणत्याही परिस्थितीत मंजूर पदांपेक्षा जास्त उप अभियंता कार्यरत राहणार नाहीत, याची सर्वार्थाने दक्षता घ्यावी.

५. वरीलप्रमाणे बदली करण्यात येत असलेल्या उप अभियंता यांच्या कार्यमुक्ती आदेशा सोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

६.      सदरहू बदली ही विनंती बदली असल्याने उपरोक्त अभियंत्यांना बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

७.      तसेच, जलसंपदा विभाग, शासन अधिसूचना, दि.२५.०४.२०१६ मधील तरतुदीनुसार क्षेत्रीय कार्यालयांतील गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या करण्यास संबंधित मुख्य अभियंता आणि एकाच महामंडळातील दोन मुख्य अभियंता कार्यालयांतर्गत बदली करण्यास संबंधित कार्यकारी संचालक / महासंचालक हे सक्षम प्राधिकारी आहेत. त्यानुषंगाने त्यांना कळविण्यात येते की, आपल्या अधिनस्त असलेले उप अभियंता  यांच्या शासन स्तरावरुन झालेल्या बदल्या विचारात  घेऊन आपल्या अधिनस्त बदल्या करताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ५(२) तसेच अधिनियमातील तसेच अधिनियमातील इतर तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

८.      संबंधित अभियंत्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, म.ना.से.(रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत कर्मचाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मुळ कार्यालयाकडे बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

९.      संबंधित कार्यकारी संचालक/मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की, त्यांनी शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१७/(१७३/१७)/आ (वर्ग-२), दि.१२.०७.२०१७ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांनुसार कार्यवाही करावी.

१०.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०५३०१७०४३९८६२७ असा आहे.  हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BAPUSAHEB RAMDAS SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=aa9f65e90f34e5648365a67ac974407846b2378509021d9a9b764788f91300c2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D6647630D541B9030FF94EF31AFD6FA8B275E0E15A69D5F68163604468DC5D6, cn=BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
Date: 2025.05.30 17:05:27 +05'30'

**( बापूसाहेब सोनवणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. अपर मुख्य सचिव (जसं.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा)(गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुंबई.

५. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा)(विदर्भ , तापी व कोंकण खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुंबई.
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
७. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
८. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
९. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१०. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
११. महासंचालक, संकल्पन,प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक.
१२. मुख्य अभियंता(जसं), जलसंपदा विभाग, पुणे.
१३. मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
१४. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक.
१५. मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुण नियंत्रण, पुणे.
१६. मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, जलसंपदा विभाग, मुंबई.
१७. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१८. मुख्य अभियंता(जसं), जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर .
१९. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, छत्रपती संभाजीनगर
२०. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक.
२१. मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.
२२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
२३. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प , जलसंपदा विभाग, नागपूर.
२४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
२५. मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा विभाग, अमरावती.
२६. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक.
२७. मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक.
२८. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
२९. मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
३०. अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक.
३१. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था(मेरी), नाशिक
३२. अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
३३. उप सचिव (प्रशा.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३४. आ (वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.

<u>विवरणपत्र</u>

शासन आदेश क्र.टिएफएस २०२५/(प्र.क्र.११३/२०२५)/आ (वर्ग-२), दि.३०/०५/२०२५ चे सहपत्र.

| अ. क्र. | अभियंत्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | बदली करण्यात आलेले विनंतीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.तुळशीराम केवळराम मेंढे, उप विभागीय अधिकारी | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत पाटबंधारे उपविभाग क्र.२, धुळे | मु.अ (जसं), जलसंपदा विभाग, नागपुर अंतर्गत बाघ पाटबंधारे व्यवस्थापन उपविभाग, आमगांव, जि.गोंदिया येथील श्रीम. मनिषा कठाणे यांच्या बदलीने होणा-या रिक्त पदी |
| २. | श्री.नरेंद्रकुमार कुसन हिंगे, उप विभागीय अधिकारी | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत लघु पाटबंधारे उप विभाग, देवरी | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत गोसीखुर्द उजवा कालवा उपविभाग क्र.१,गोसीखुर्द, मु. तिरोडा येथील श्री. प्रविण नारायण भलावी यांच्या बदलीने होणा-या रिक्त पदी |
| ३. | श्री. निरज भास्करराव तुलसीनंदन, उप विभागीय अधिकारी | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपुर अंतर्गत कोच्छी बॅरेज उपविभाग क्र. १ खापा | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत लघु पाटबंधारे उप विभाग, गोंदिया येथील श्री. सचिन धनेश मडकाम यांच्या बदलीने होणा-या रिक्त पदी |
| ४. | श्री. दिनेश किसनराव देवरे, उपविभागीय अधिकारी | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत जलसंपत्ती सर्व्हेक्षण व अन्वेषण उपविभाग धोंडावडवली | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत पुनंद उजवा कालवा उपविभाग, कोल्हापूर ता. कळवण येथील श्री.निलेशकुमार वनाजी जावरे यांच्या बदलीने होणा-या रिक्त पदी |

| अ. क्र. | अभियंत्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | बदली करण्यात आलेले विनंतीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ५. | श्री. सुरज विजय बोरेले, सहायक अभियंता श्रेणी -१ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग , नागपूर अंतर्गत पाटबंधारे उपविभाग क्र.२, नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग , नागपूर अंतर्गत पेंच पाटबंधारे उपविभाग, कांद्री येथील श्री.महादेव रामदास हावरे यांच्या बदलीने होणा-या रिक्त पदी. |

BAPUSAHEB RAMDAS SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=aa9f65e90f34e5648365a67ac974407846b2378509021d9a9b764788f91300c2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D6647630D541B9030FF94EF31AFD6FA8B275E0E15A69D5F68163604468DC5D6, cn=BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
Date: 2025.05.30 17:06:00 +05'30'

( बापूसाहेब सोनवणे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन